**भूसंपादन आस्थापना: विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या कार्यालयातील निवाडा शाखेतील ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यत मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. अपमु-२०२३/प्र.क्र.२५१/अ-२**

**(ई- ऑफिस क्र.६७४५२८)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:-२८.०३.२०२५

वाचा: १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एलक्यूएन ३१७१/क्यू, दि.०४.०८.१९७२.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दि.०६.०९.२०२४.

३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. अपुम-२०२३/प्र.क्र.२५१/अ-२, दि.२५.१०.२०२४.

४) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र. संसनर/नि.शा./पदांना मुदतवाढ/२४, दि.२६.०३.२०२५.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

वित्त विभाग, शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ अन्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत मान्यता देण्यात आली आहे.

विभागीय आयुक्त, कोकण, यांनी त्यांचे दि.२६.०३.२०२५ च्या पत्रानुसार त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी शासन निर्णय दि.२५.१०.२०२४ अन्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. सदर पदांची मुदतवाढ आता संपुष्ठात आली आहे. भूसंपादन कार्यालयामध्ये कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नाही. वित्त विभाग शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, कोकण, यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एलक्यूएन ३१७१/क्यू, दि.४.०८.१९७२ अन्वये आयुक्त, कोकण विभाग यांचेकडे कोकण विभागातील विशेष भूसंपादन अधिकाऱ्यांकडून येणाऱ्या भूसंपादन संबंधीत प्रारुप निवाडयाची छाननी करण्यासाठी नगर रचनाकार-२, रचना सहायक-२ व लघु टंकलेखक-१ अशी एकूण ५ अस्थायी पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. तथापि, विभागीय आयुक्त, कोकण यांच्या दि.२७.०२.२०२४ रोजीच्या पत्रामध्ये नमूद केल्यानुसार सहायक संचालक नगररचना-१ पद, रचना सहायक -१ पद व लघुटंकलेखक-१ पद अशी एकूण ३ पदे सद्यस्थितीत कार्यरत आहेत.

२. शासन निर्णय दि.२३.१०.२०१७ अन्वये, निवाडा शाखेतील नगररचनाकार संवर्गातील पद सहायक संचालक, नगररचना या पदात रुपांतरित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच शासन निर्णय दि.२५.१०.२०२४ अन्वये, दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती.

३. शासन निर्णय दि.०९.०४.२०२१ व दि.३०.०३.२०२२ मध्ये, "सहाय्यक नगररचनाकार" या पदाऐवजी "रचना सहाय्यक" या पदांना मुदतवाढ दिलेली आहे.

विभागीय आयुक्त, कोकण यांच्या दि.२६.०३.२०२५ रोजीच्या प्रस्तावामध्ये नमूद केलेल्या सहायक संचालक नगररचना -१ पद, रचना सहायक-१ पद व लघुटंकलेखक-१ पद असे एकूण ३ पदांस मुदतवाढ देणेसंदर्भात विनंती केली आहे. वित्त विभाग शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ मधील तरतूदी विचारात घेता, विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या कार्यालयातील निवाडा शाखेतील खालील तक्त्यात नमूद ३ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

| कार्यालय | पदनाम | पदांची संख्या | सुधारित वेतन श्रेणी |
|---|---|---|---|
| विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण. | सहायक संचालक, नगररचना | १ | स्तर - २३ |
| | रचना सहायक | १ | स्तर - १४ |
| | लघु टंकलेखक | १ | स्तर - ८ |

**अटी:-**

१. अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२. अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

३. प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नसल्याचे प्रस्तावात नमूद केले आहे. विभागीय आयुक्त, कोकण यांनी सदरच्या पदांची नमूद केलेली अत्यावश्यकता विचारात घेता, सदर ३ पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीच्या अनुषंगाने विसंगत कार्यवाही करण्यात आल्यास व त्यामुळे काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

४. सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५. सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

६. ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

७. सदरची मुदतवाढ संपुष्ठात आल्यानंतर पुढील मुदतवाढीसंदर्भातील प्रस्ताव सादर करताना, शासन पत्र दि.०७.१०.२०२४ सोबत जोडलेले विहीत विवरणपत्र अ,ब,क,ड-१, ड-२ व ड-३ मध्ये नमूद माहिती सादर करावी अन्यथा अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्यात येणार नाही, याची दक्षता घ्यावी.

**४.** उपरोक्त पदांना शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या स्थायी आदेशाप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरकभत्ते मिळण्यास पात्र राहतील.

**५.** या बाबत होणारा खर्च मागणी क्रमांक "सी-१-२०५३-जिल्हा प्रशासन-१०१-आयुक्त (०१) (०१) आयुक्त कोकण वेतने (२०५३-०३८-७०१)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाचे, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क.,दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे, विभागीय आयुक्त, कोकण यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेतांना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय

सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करणे आवश्यक आहे. सबब, त्याबाबतचे प्रस्ताव विहीत कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३२८१५१६१८९३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2025.03.28 15:17:41 +05'30'

**( माणिक ढमाले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई. (३ प्रती )
२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३. संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई. (३ प्रती)
५. वित्त विभाग, व्यय-९, अर्थसंकल्प-१९, वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी- कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अ-३ आणि अ-४, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (अ-२).